राज्य कामगार विमा योजना बगडगंज, नागपूर या सेवा दवाखान्यांच्या कुंपन भिंतीच्या बांधकामास मंजूरी देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः राकावि-२०१४/प्र.क्र.३३८/१४/राकावि-२

गोकूळदास तेजपाल रुग्णालय आवार, संकूल इमारत, १० वा मजला
बी-विंग, मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
दिनांक : २० ऑगस्ट, २०१८.

वाचा -

**१) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, दिनांक १७ एप्रिल, २०१५.**

**२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.राकायो-२०१५/प्र.क्र.२३१/१५/राकावि-२, दिनांक २०.०८.२०१५.**

**३) आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई यांचे पत्र क्र.आयुक्त/राकावियो/नागपुर भुखंड बगडगंज/संरक्षण भिंत निधी/१३२८५-८७/२०१४, दिनांक ०३ डिसेंबर, २०१४.**

**४) आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई यांचे पत्र क्र.आयुक्त/राकावियो/का.क्र.९/से.द.बगडगंज/१७६०-६१/२०१८, दिनांक ०३ फेब्रुवारी, २०१८.**

### प्रस्तावना -

शासनाने सन १९६७ साली बगडगंज, नागपूर येथे राज्य कामगार विमा योजने अंतर्गत सेवा दवाखाना सुरु करण्यासाठी “नागपूर सुधार प्रन्यास” कडुन भुखंड खरेदी केला होता. आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई यांनी संदर्भ क्र.३ च्या पत्रान्वये बगडगंज, नागपूर येथे सेवा दवाखान्याच्या कुंपन भिंत बांधण्याच्या कामास एकूण रुपये २१,४६,०००/- (अक्षरी रुपये एकवीस लाख शेहेचाळीस हजार फक्त) एवढया रक्कमेचा प्रस्ताव शासनास सादर केला होता. त्यानुषंगाने वस्तु व सेवा कर व इतर अनुषंगिक बाबींचा विचार करुन एकूण रक्कम रुपये २२,८८,९४०/- इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

### शासन निर्णय -

या शासन निर्णयान्वये बगडगंज, नागपूर येथे सेवा दवाखान्याच्या कुंपन भिंत बांधण्याच्या कामास एकूण रुपये २२,८८,९४०/- (अक्षरी रुपये बावीस लाख अठ्ठयाऐंशी हजार नऊशे चाळीस फक्त) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधीन राहून खालील विवरण पत्राप्रमाणे प्रशासकीय मान्यता मान्यता देण्यात येत आहे.

(अ) काम सुरु करण्यापूर्वी सदर अंदाजपत्रक सार्वजनिक बांधकाम विभागाचे संबंधित मुख्य अभियंता यांच्याकडून साक्षांकित करुन घ्यावे.
(ब) काम सुरु करण्यापुर्वी मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तूविशारदांकडून मंजूरी घेऊनच काम सुरु करावे.
(क) काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूतर्ता करुन घ्यावी.
(ड) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक दरपत्रके मंजूर करुनच काम हाती घ्यावे.
(इ) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.
(ई) कामासाठी निविदा मागविण्याआधी सदर कामास सार्वजनिक बांधकाम विभागातील सक्षम अधिकाऱ्यांची तांत्रिक मंजुरी घेणे आवश्यक आहे.

**विवरणपत्र**

| Sr.No. | Particulars | Amount in Rs. |
|---|---|---|
| 1 | COST OF WORK | 1816687.00 |
| 2 | Add 4% for contingencies | 75667.00 |
| 3 | Add 10% Water Supply & Sanitary fitting | 0.00 |
| 4 | Add for Demolition of old structures (Lumsum) | 25000.00 |
| 5 | Fire Fightening Equipment (Lumsum) | 0.00 |
| 6 | Ground Development (Lumsum) | 50000.00 |
| 7 | Rain Water Harvesting (Lumsum) | 0.00 |
| 8 | Approach Road & Parking (Lumsum) | 0.00 |
| 9 | Parks & Garden (Lumsum) | 0.00 |
| 10 | Add 20% for furniture & Partitions on RS. 47455414.00 | 0.00 |
| 11 | Add 1% for approval of Building plan & Tree cutting from Nagpur Muncipal Corporation, Nagpur. | 0.00 |
| 12 | Add for adjoining ramp tower | 0.00 |
| 13 | Add 5% Centage | 94584.00 |
| 14 | Add 12% GST | 227002.00 |
| | **Total Civil Cost** | **22,88,940.00** |
| | | |
| | | **Say Rs. 22,88,940.00** |

सदर खर्च संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयान्वये खालील लेखाशिर्षामध्ये उपलब्ध करुन देण्यात आलेलया तरतुदीपैकी शिल्लक असलेल्या तरतुदीमधुन भागविण्यात यावा. “मागणी क्र.आर-१, सार्वजनिक आरोग्य विभाग,२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०१-नागरी आरोग्य सेवा (विषम चिकित्सा), १०२-राज्य कामगार विमा योजना, १०२-(१)-बृहन्मुंबईतील व मुफसल क्षेत्रातील

राज्य कामगार विमा योजना, (०१) (०२)- वैद्यकीय प्रशासन अधिकारी, राज्य कामगार विमा योजना (२२१० १३८५), २७ लहान बांधकामे" या लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ या वित्तीय वर्षाच्या उपलब्ध तरतुदीतून भागविण्यात यावा.

शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग-पहिला, उपविभाग-पाच, अनुक्रमांक तीन, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४ नुसार प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८२०१२३८०५५३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhise Govind Changoji

Digitally signed by Bhise Govind Changoji
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e9596d652d5b6cb0f88e4c39c6c2adf97629debbf12176865f2683a6eb9318e8, cn=Bhise Govind Changoji
Date: 2018.08.20 15:07:28 +05'30'

**डॉ.गोविंद भिसे**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई.
२. संचालक, राज्य कामगार विमा योजना, मुंबई.
३. वैद्यकीय प्रशासन अधिकारी, राज्य कामगार विमा योजना, नागपूर.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, कोषागार कार्यालय, नागपूर.
६. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर.
७. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर.
८. कार्यकारी अभियंता, एकात्मिक घटक (एम), सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर.
९. वित्त विभाग/सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.अर्थसंकल्प शाखा, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.निवड नस्ती (राकावि-२).